**अव्वल कारकून संवर्गातून नायब तहसिलदार संवर्गात निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात नियमित पदोन्नती कोट्यातील रिक्त पदावर तसेच सरळसेवेच्या कोट्यातील पदांवर तदर्थ पदोन्नतीने पदस्थापना देणेबाबत (नागपूर विभाग).**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पदोन्न -२०२३/प्र.क्र. २३३/ई-९**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ०७ मार्च, २०२४.

**वाचा :-**

१) उप आयुक्त, नागपुर विभाग, नागपुर यांचे पत्र क्र. मशा६(३)/आस्था-१/सीआर-२२/२०२३/ कावि१०४२/२०२३ दि.२४.११.२०२३ व दि.१५.१२.२०२३

**शासन आदेश:-**

नागपूर विभागातील अव्वल कारकून संवर्गातील खालील तक्त्यात नमूद कर्मचाऱ्यांना नायब तहसिलदार (राजपत्रीत, गट -ब) या संवर्गात सन २०२३-२४ या निवडसूची वर्षात सामान्य प्रशासन विभागाने दिलेल्या सहमतीनुसार खालीलप्रमाणे सरळसेवेच्या कोट्यातील रिक्त पदांवर तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहे. तसेच, त्यांची नायब तहसिलदार संवर्गात पदोन्नतीने पदस्थापना खालील तक्त्यातील स्तंभ क्र.७ येथे नमूद पदावर परिच्छेद क्र.३ येथील अटींच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

**सरळसेवा कोट्यातील रिक्त पदांवर तदर्थ पदोन्नती:-**

**अव्वल कारकून (३):-**

| अ.क्र | दि.१.१.२०२३ नुसार ज्ये.क्र. | दि.१.१.२०२० नुसार ज्ये.क्र. | कर्मचाऱ्याचे नांव | जात प्रवर्ग | पात्रता | पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | ११९ | २६५ | श्री. व्ही. सी. येरमे | अ. जमाती | सेवाज्येष्ठतेनुसार पात्र | नायब तहसिलदार (रोहयो), जिल्हाधिकारी कार्यालय गडचिरोली, जि. गडचिरोली |
| २ | १२१ | २६७ | श्री. आय. आर. राऊत | इ.मा.व | सेवाज्येष्ठतेनुसार पात्र | नायब तहसिलदार (जमीन), जिल्हाधिकारी कार्यालय गडचिरोली, जि. गडचिरोली |
| ३ | १२२ | २६८ | श्री. एस. पी. बगमारे | इ.मा.व | सेवाज्येष्ठतेनुसार पात्र | नायब तहसिलदार उप विभागीय अधिकारी कार्यालय अर्जुनी मोरगांव, जि. गोंदिया |

३. सदर सरळसेवेच्या कोट्यात तदर्थ पदोन्नती खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे:-

१) मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७च्या अधिन राहून पदोन्नतीच्या कोटयातील सर्व रिक्त पदे दि.२५.५.२००४ स्थित

सेवाज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात भरण्याबाबत सा.प्र.वि./१६ब कार्यासनाच्या दि.७.५.२०२१ च्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सूचनांनुसार सदर मान्यता देण्यात येत आहे. तसेच, दिनाक ७ मे,२०२१ च्या शासन निर्णयाप्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आलेले असून त्यावरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून सदर सहमती देण्यात येत आहे.

२) दिव्यांग कर्मचाऱ्यांना गट-अ व गट-ब मधील पदांवर पदोन्नतीबाबत सा.प्र.वि/१६-अ यांनी दि. २०.०४.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिलेल्या सूचनांनुसार सदर मान्यता देण्यात येत आहे.

३) सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा कोणताही हक्क मिळणार नाही.

४) निवडसूचीतील सर्व अधिका-यांनी सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक १ ऑगस्ट, २०१९ च्या शासन निर्णयात विहित केलेल्या पदोन्नतीच्या निकषाची पूर्तता केली आहे. या अटीच्या अधिन सदर निवडसूचीस मान्यता दर्शविण्यात येत आहे.

५) सदर निवडसूचीतील सेवाज्येष्ठतेनुसार पात्र असलेल्या, तथापि पदोन्नती नाकारलेल्या, अधिकाऱ्यांच्या पदोन्नती संदर्भात या विभागाच्या दिनांक १२/०९/२०१६ च्या शासन निर्णयानुसार कार्यवाही करण्याची विभागीय आयुक्त यांनी दक्षता घ्यावी.

६) सरळसेवा कोट्यात रिक्त झालेल्या पदावर देण्यात आलेली तदर्थ पदोन्नती ही ११ महिने किंवा म.लो.आ. कडून उमेदवार उपलब्ध होतील, यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत राहील. दरम्यानच्या काळात आयोग पुरस्कृत उमेदवार उपलब्ध झाल्यास तदर्थ पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्यास पदावनत करण्यात येईल. सदर पदोन्नती तात्पुरत्या स्वरुपात असून सदर पदावर संबंधित अधिकाऱ्याचा कायमस्वरुपी धारणाधिकार राहणार नाही.

७) सरळसेवेच्या कोट्यातील रिक्त पदांवर दिलेल्या तदर्थ पदोन्नत्या नियमित पदोन्नती कोटयामध्ये पदांच्या उपलब्धतेनुसार समायोजित करुन नियमित निवडसूचीस सामान्य प्रशासन विभागाची व महाराष्ट्र लोकसेवा आयोगाची मान्यता घेण्याची दक्षता विभागीय आयुक्त, नागपूर यांनी घ्यावी.

८) सदर तात्पुरत्या पदोन्नतीच्या अनुषंगाने पदस्थापनेचे आदेश प्राप्त झाल्यापासून संबंधित अधिकाऱ्यांची शासनाच्या पुर्व परवानगीशिवाय कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करू नये.

९) तसेच भविष्यात न्यायालयीन अथवा पदोन्नतीच्या अनुषंगाने इतर काही आक्षेप निघाल्यास याची संपुर्ण जबाबदारी विभागीय आयुक्त, नागपुर विभाग, नागपुर या कार्यालयाची राहील.

४. उपरोक्त अधिकाऱ्यांयांना पदोन्नतीच्या पदावर तात्काळ रुजू होण्यासाठी आदेशाच्या दिनांकापासून एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत आहे. सदर आदेश हेच कार्यमुक्तीचे आदेश असून, संबंधित कार्यालयांनी नव्याने कार्यमुक्ती आदेश निर्गमित करण्याची आवश्यकता नाही. त्यामुळे इतर कोणत्याही आदेशाची वाट न पाहता उक्त अधिकाऱ्यांनी पदोन्नतीने दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजु व्हावे.

५. सदर आदेशान्वये दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी रुजु न होणाऱ्या अधिकाऱ्यांविरुध्द विभागीय आयुक्त, नागपूर यांनी तात्काळ शिस्तभंगविषयक कार्यवाही सुरु करावी व तसा अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

६. सदरची पदोन्नती सामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.९५९/का.१२, दि.१०.१०.२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेच्या अधीनतेने देण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३०७१२००५९९८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHRIKANT
MADHUKAR
MOHITE

Digitally signed by SHRIKANT MADHUKAR MOHITE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT,
2.5.4.20=5b514d2c3257bba976c5a2de42be8a635bba691c05d1f65ed0ead155a190e90e, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=5F152866E6FC64E39CF88B9CB27AE0169A65B000039B269233C42B5B77F06B31, cn=SHRIKANT MADHUKAR MOHITE
Date: 2024.03.07 12:11:43 +05'30'

**(श्रीकांत म. मोहिते)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

विभागीय आयुक्त, नागपुर विभाग, नागपुर.

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
२. मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
३. मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
४. मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
५. अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई ३२.
६. संबंधित जिल्हाधिकारी.
७. प्रधान महालेखापाल, (लेखापरीक्षा व लेखा अनुज्ञेयता) नागपूर.
८. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
९. संबंधीत अधिकारी (विभागीय आयुक्त, नागपुर विभाग, नागपुर यांच्यामार्फत).
१०. निवडनस्ती, कार्यासन ई-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.